पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांच्या बदल्या करताना
पोलीस आस्थापना मंडळांनी अनुसरावयाची कार्यपध्दती

**महाराष्ट्र शासन**
शासन निर्णय क्रमांक : टीआरएन -०११०/प्र.क्र.४८८/पोल-५ब
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२, दिनांक: २३ एप्रिल , २०१०

<u>वाचा :-</u> १) शासन निर्णय क्र. टिआरएन-०८०६/प्र.क्र.५२१/पोल-५ब,दि.२८.०८.०६
२)शासन निर्णय क्र. टिआरएन-०४०७/प्र.क्र.४५१/पोल-५ब दि.०३.०५.०७
३) शासन निर्णय क्र. टिआरएन-०४०७/प्र.क्र.४५७/पोल-५ब,दि.१७.५.०७
४) शासन निर्णय क्र एनपीसी १००८/२/प्र.क्र.६/पोल-३, दि.२५.७.२००८
५) शासन अधिसूचना क्र रापोसे ३३०६/प्र.क्र.६१५/पोल-१ अ, दि.३०.०४.२००७
६)शासन निर्णय क्र. पीएमएन-०१०९/प्र.क्र.८५२/पोल-५ब दि.०८.१२.०९

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ हा दिनांक १.७.२००६ पासून महाराष्ट्र राज्यात लागू करण्यात आला आहे. तसेच मा. सर्वोच्च न्यायालयाने श्री.प्रकाशसिंग व इतर विरुध्द भारत सरकार व इतर रिट अर्ज क्र. ३१०/१९९६ मध्ये दिलेल्या आदेशानुसार शासन निर्णय क्र एनपीसी १००८/२/प्र.क्र.६/पोल-३, दि.२५.७.२००८ अन्वये विविध स्तरावर पोलीस आस्थापना मंडळ स्थापन करण्यात आली आहेत. बदली अधिनियमातील तरतूदींच्या अधीन राहून या पोलीस आस्थापना मंडळांना पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांच्या बदल्यांबाबत कार्यवाही करावयाची आहे. बदली अधिनियमातील तरतूदीनुसारच बदल्यांबाबत कार्यवाही व्हावी. विविध पोलीस आस्थापना मंडळांच्या कामात सुसुत्रता असावी तसेच मा. सर्वोच्च न्यायालयाने केलेल्या मागदर्शन सुचना यानुसारच बदल्या व्हाव्यात यासाठी सर्व समावेशक मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** शासन निर्णय क्र. टिआरएन-०४०७/प्र.क्र.४५१/ पोल-५ब. दि.०३.०५.०७आणि शासन निर्णय क्र. टिआरएन-०४०७/प्र.क्र.४५७/ पोल-५ब, दि.१७.५.०७ याद्वारे अधिक्रमित करण्यात येऊन पुढीलप्रमाणे मार्गदर्शक तत्वे शासन मान्यतेने निश्चित करण्यात येत आहेत.

# पोलीस आस्थापना मंडळांसाठी मार्गदर्शक तत्वे

**क्र. (१) राज्य पोलीस दलातील पोलीस शिपाई ते सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक-(गट-क) या संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या बदल्यांसाठी निकष**

अ या संवर्गातील कर्मचाऱ्यांचा एका पोलीस स्टेशनमधील कालावधी खंडीत/अखंडीत सेवा धरुन ०६ वर्षापर्यत राहील.

ब तालुक्यामध्ये एकापेक्षा जास्त पोलीस स्टेशन असल्यास त्या तालुक्यामधील कमाल कालावधी सर्व संवर्गातील खंडीत अथवा अखंडीत सेवा धरुन १२ वर्षे राहील.

क पोलीस आयुक्तालयामध्ये परिमंडळ हे तालुक्याशी समकक्ष समजण्यात यावे.

ड स्वग्राम असलेल्या तालूक्यात बदली / नेमणूक देवू नये.

इ गुन्हे शाखेत तीन वर्षापेक्षा जास्त नेमणूक देवू नये.

**क्र. (२) राज्य पोलीस दलातील पोलीस उप निरीक्षक(अराजपत्रित गट-ब), सहायक पोलीस निरीक्षकं(राजपत्रित गट-ब) व पोलीस निरीक्षक (राजपत्रित गट-अ) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांसाठी निकष**

अ या संवर्गातील अधिकाऱ्यांचा बदली अधिनियमानुसार एका पदावरील कालावधी ०३ वर्षाचा राहील.

ब जिल्हयात/ आयुक्तालयातील कमाल कालावधी सर्व संवर्गातील खंडीत अथवा अखंडीत सेवा धरुन ०६ वर्षाचा राहील.

क परिक्षेत्रातील कमाल कालावधी सर्व संवर्गातील खंडीत अथवा अखंडीत सेवा धरुन ०९ वर्षाचा राहील.

क्र. (३) वरील क्र. १ व २ प्रमाणे कालावधीची गणना करतांना बदली वर्षातील ३१ मे पर्यंतचा कालावधी धरण्यात यावा.

क्र.(४) बदलीपात्र अधिकारी/ कर्मचारी यांची बदली करण्यापूर्वी त्यांच्याकडून पसंतीची ०३ घटक कार्यालयांची नावे प्राधान्यक्रमाने घेवून शक्यतो त्याप्रमाणेच बदल्या कराव्यात. मात्र पसंतीची ठिकाणे ही विशिष्ट पोलीस ठाणे नसुन जिल्हा / घटक कार्यालयाची नावे असतील.

क्र.(५) बदल्या करतांना या अधिकारी/ कर्मचारी यांच्या पुढील पदोन्नतीसाठी अकार्यकारी पदावरील सेवा पूर्ण करणे आवश्यक असल्यास, अकार्यकारी पदावर सदर अधिकारी/ कर्मचारी यांना नियुक्ती देणे ही नियुक्ती प्राधिकाऱ्याची जबाबदारी राहील. त्यामुळे बदल्यां करताना आवश्यक ती अकार्यकारी पदावरील सेवा पूर्ण होण्याच्या दृष्टीने संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांची बदली करण्याची योग्य ती खबरदारी नियुक्ती प्राधिकाऱ्याने घ्यावी.

क्र. (६) कर्मचारी / अधिकाऱ्याने पदोन्नती नाकारल्यास त्याची सध्याच्या पदावरुन अकार्यकारी पदावर बदली अधिनियमातील तरतुदी अंतर्गत बदली करण्यात यावी.

क्र.(७) बऱ्याचदा बदली परिणामस्वरुप रिक्त होणाऱ्या पदावर बदली अधिनियम कलम क्र.४ (१) चा आधार घेवून अन्य अधिकारी/ कर्मचारी यांची बदली रिक्त पदावर करण्यात येते व त्यांच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदावर याच अधिनियमाचा आधार घेवून अन्य अधिकारी/ कर्मचारी यांची नियुक्ती केली जाते. अशातऱ्हेने बदल्यांची शृंखला तयार केली जाते. बदली अधिनियमानुसार हे नियमबाहय आहे. त्यामुळे बदली परिणामस्वरुप रिक्त होणाऱ्या पदावर बदली करावयाच्या अधिकारी/ कर्मचारी यांची त्याच्या सध्याच्या पदावरील ३ वर्ष सेवा पूर्ण झालेली असल्यासच अधिनियम कलम क्र. ४ (१) नुसार बदली करता येईल. मात्र ३ वर्षे सेवा पूर्ण झाली नसल्यास लगतनंतरच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने (अधिनियमातील क्र.४(५) नुसार) बदल्या करण्यात याव्यात.

क्र.(८) "तात्पुरते संलग्न करणे" ही कार्यवाही देखील बदली अधिनियमानुसार बदलीच आहे. बदली अधिनियमामध्ये तात्पुरते संलग्न करणे अशी तरतूद नसल्याने कोणताही अधिकारी/ कर्मचारी यांना तात्पुरते संलग्न करण्याचे आदेश काढून बदली करण्यात येवू नये. काही विशेष कारणामुळे या अधिकारी/ कर्मचारी यांची तात्काळ बदली करणे आवश्यक असल्यास बदली अधिनियमातील तरतूदीनुसार असे प्रस्ताव लगत नंतरच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्याच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावेत.

क्र.(९) बदल्यांचे प्रस्ताव तयार करताना नक्षलग्रस्त भागात कार्यरत अधिकारी/ कर्मचारी यांचा नक्षलग्रस्त भागातील विहीत कालावधी पूर्ण झाला असल्यास त्यांच्या पसंती क्रमांकानुसार त्यांना बदलीने प्रथम नियुक्ती देण्यात यावी व यामुळे रिक्त होणारी पदे ३ वर्षे विहीत कालावधी पूर्ण केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या बदलीने भरण्यात यावी. ३ वर्षे कार्यकाल पूर्ण केलेले कर्मचारी / अधिकारी उपलब्ध नसल्यास आवश्यक बदल्यांचा प्रस्ताव लगत नंतरच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्याच्या मान्यतेसाठी तात्काळ सादर करण्यात यावा.

क्र.(१०) यापुढे पोलीस उप निरीक्षकांची नवीन तुकडी प्रशिक्षणानंतर ज्यावेळी प्रत्यक्षात कर्तव्यावर रुजू होते त्यावेळी संबंधित वर्षात नक्षलग्रस्त भागात विहित कालावधी पूर्ण करणाऱ्या पोलीस उप निरिक्षकांच्या संख्येचा विचार करुन तितक्या नवीन तुकडीतील पोलीस उप निरीक्षकांना तेथे प्रथम नियुक्ती देण्यात यावी.

क्र.(११) शासन अधिसूचना क्र. रापोसे ३३०६/प्र.क्र.६१५/पोल-१ अ, दिनांक ३०.०४.२००७ ही अधिनियमाच्या कलम ७ मधील तरतूदीनुार निर्गमित करण्यात आली असून त्याद्वारे विभाग प्रमुख, प्रादेशिक विभाग प्रमुख, जिल्हा व घटक प्रमुख अधिसूचीत करण्यात आले आहेत. या शासन अधिसूचनेतील घोषीत सक्षम प्राधिकारी हे केवळ सर्वसाधारण बदल्यांच्यावेळी अशा बदल्या करण्यास सक्षम राहतील. मात्र या बदल्या करतांना ज्यांची बदली करावयाची आहे अशा कर्मचाऱ्यांचा / अधिकाऱ्यांचा अधिनियमामधील कलम ३ नुसार शेवटच्या पदावर ३ वर्षाचा विहित कालावधी पूर्ण झालेला असला पाहिजे. अन्यथा कलम ४ (५) मधील तरतूदींनुसार कलम ६ च्या तक्त्यामध्ये उल्लेखिलेल्या बदली करणाऱ्या लगत वरिष्ठांच्या मान्यतेशिवाय बदली करता येणार नाही.

क्र.(१२) पोलीस अधिकारी यांची त्यांच्या मूळ जिल्ह्यात बदली करण्यात येऊ नये

क्र.(१३) वर्षभरात अथवा सर्वसाधारण बदल्यांच्या वेळीदेखील विनंतीवरुन अथवा अन्य कारणामळे बदली करावयाची असल्यास आणि अशा कर्मचाऱ्याचा विहीत कालावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली असल्यास सक्षम प्राधिकाऱ्यांच्या वरीष्ठ प्राधिकाऱ्यांची पूर्व मान्यता बदली अधिनियमानुसार घेतल्यानंतरच अशा बदल्या करण्यात याव्यात.

क्र. (१४) संदर्भाधीन शासन निर्णय क्र. टिआरएन-०८०६/प्र.क्र.५२१/ पोल-५ब, दि.२८.०८.०६ अन्वये व शासन अधिसूचना क्र. रापोसे ३३०६/प्र.क्र.६१५/पोल-१ अ, दिनांक ३०.०४.२००७ अन्वये पोलीस अधिकाऱ्यांच्या / कर्मचाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्यांचे अधिकार 'महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ ' च्या कलम४(१) व ४(२) मधील तरतुदीप्रमाणे विभाग प्रमुख, प्रादेशिक विभाग प्रमुख व जिल्हा / घटक प्रमुख यांना सदर अधिनियमाच्या कलम ०६ खालील परंतुकानुसार /कलम ७ नुसार प्रदान करण्यात आले आहेत. मात्र या अधिनियमातील नियम क्र.४(४) (दोन) आणि ४(५) मधील तरतुदीप्रमाणे बदल्यांचे अधिकार शासनाकडेच आहेत. म्हणजेच ज्या अधिकाऱ्यांची बदली त्याच्या सध्याच्या पदावरील विहीत कार्यकाल पूर्ण व्हावयाच्या अगोदर करावयाची असेल (म्हणजेच मुदतपूर्व)तसेच सध्यांच्या पदावर विहित कार्यकाल पूर्ण झाला आहे. परंतु बदली सर्वसाधारण बदल्यांव्यतिरिक्त वर्षभरात इतर वेळी होत असेल (म्हणजेच मध्यावधी) अशावेळीही सक्षम प्राधिकाऱ्यांच्या वरीष्ठांची पूर्व मान्यता घ्यावी लागेल.

क्र.(१५) अधिनियमातील कलम ६ मधील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये गट "अ", गट "ब" मधील राजपत्रीत अधिकाऱ्यांच्या बदल्या करण्यास संबंधित विभागाच्या सचिवांशी विचार विनीमय करुन त्या विभागाचा प्रभारी मंत्री बदली करणारा सक्षम प्राधिकारी अशी तरतुद आहे. त्यामुळे गट "अ" व राजपत्रित गट "ब" पदावरील पोलीस अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्यांबाबत राज्य आस्थापना मंडळाने निर्णय घेण्यापूर्वी गृह विभागाच्या सचिवांशी विचारविनिमय करावा.

क्र.(१६) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी अधिनियम २००५ मधील तरतूदीनुसार तसेच उपरोक्त मार्गदर्शक तत्वे विचारात घेवूनच बदल्यांबाबत कार्यवाही करण्यात यावी. तसे न झाल्यास संबंधित अधिकारी हे व्यक्तिशः जबाबदार राहतील. तसेच राज्य आस्थापना मंडळाच्या शिफारशी नुसार निर्गमित केलेल्या बदल्यांचे सर्व आदेश शासनाकडे त्याच दिवशी पोहचतील याची दक्षता घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

( सदानंद जाधव )
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
२) महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, म.रा. मुंबई
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
४) सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक (रेल्वेसह)
५) सर्व पोलीस आयुक्त (रेल्वेसह)
६) सर्व पोलीस अधिक्षक (रेल्वेसह)
७) निवडनस्ती.
८) संग्रहार्थ नस्ती.